**एफ.सी. बायर्न फुटबॉल क्लब, म्युनिच, जर्मनी आणि श्रीशिवछत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी-म्हाळुंगे, पुणे यांमध्ये झालेल्या सामंजस्य करारासाठी व राज्यातील मुलांना जर्मनी येथे फुटबॉल प्रशिक्षणाकरीता पाठविण्यासाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण-३३२२/प्र.क्र.१५८/कीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२३

**वाचा:-**

१) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. एफसीबी/करारनामा/२०२२-२३/का-११/९८८, दि.१६ जानेवारी, २०२३.
२) उच्चस्तर धोरण समितीच्या दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३) शासनाचे समक्रमांकाचे, दि. १३ फेब्रुवारी, २०२३ चे पत्र.
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण-३३२२/प्र.क्र.१५८/क्रीयुसे-१, दिनांक १५ मार्च, २०२३.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. एफसीबी/करारनामा/२०२२-२३/का-११/९८८, दिनांक २० मार्च, २०२३ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

एफ.सी. बायर्न फूटबॉल क्लब, म्युनिक जर्मनी व क्रीडा संचालनालय, पुणे यामध्ये झालेल्या सामंजस्य करारानुसार, महाराष्ट्रातील १४ वर्षाखालील २० मुलांची जिल्हा / विभाग / राज्यस्तरावर "महाराष्ट्र फुटबॉल कप स्पर्धा" आयोजित करुन, चाचणी स्पर्धेद्वारे त्यांची निवड करुन, जर्मनी येथे फुटबॉल प्रशिक्षणासाठी पाठविणे व इतर तद्नुषंगिक बाबीवरील खर्चासाठी रु.१३०.०० लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देणेबाबत संदर्भ क्र. १ अन्वये क्रीडा संचालनालयाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावास, संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तर समितीच्या दि. ३ फेब्रुवारी, २०२३ च्या बैठकीत एफ.सी. बायर्न फूटबॉल क्लब, म्युनिक, जर्मनी यांचेशी करारनामा करण्याचा व महाराष्ट्रातील २० मुलांना फुटबॉलच्या अद्ययावत प्रशिक्षणाकरीता एफ.सी.बायर्न क्लब, म्युनिक, जर्मनी येथे पाठविण्याकरीता तातडीने आवश्यक रु.१३०.०० लक्ष इतका निधी, शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे यांच्या क्रीडा सुविधा वापरापोटी जमा शुल्कातून/भाडयाच्या जमा रकमेतून तात्पुरत्या स्वरुपात उपलब्ध करुन घेऊन, तद्नंतर त्याची प्रतिपूर्ती शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे याना करण्याबाबत निर्णय घेण्यात आला. त्यानुसार संदर्भ क्र.३ येथील शासन पत्रान्वये यासाठी तातडीने आवश्यक असलेला निधी श्रीशिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे यांच्या सुविधा वापरापोटी जमा होणाऱ्या शुल्कातून/भाडयाच्या जमा रकमेतून उपलब्ध करुन घेण्यास शासनाने मान्यता दिली आहे. त्यानुसार श्री

शिवछत्रपती क्रीडा संकुलाच्या क्रीडा सुविधा भाडयाच्या जमा रक्कमेतून क्रीडा संचालनालयाने अदा केलेल्या रु.१३०.०० लक्ष रक्कमेची प्रतिपूर्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णय, दिनांक १५ मार्च, २०२३ अन्वये दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार एफ.सी. बायर्न फूटबॉल क्लब, म्युनिक जर्मनी यांचेशी सामंजस्य करार करण्याच्या आणि राज्यातील निवडक २० मुलांना जर्मनी येथे अद्ययावत फुटबॉल प्रशिक्षणासाठी पाठविण्याच्या व तद्नुषंगिक बाबींवरील खर्चासाठी श्री शिवछत्रपती क्रीडा संकुल, महाळुंगे-बालेवाडी, पुणे या क्रीडा संकुलाच्या क्रीडा सुविधा वापरापोटी जमा शुल्कातून / भाड्याच्या जमा रकमेतून अदा केलेल्या रु.१३०.०० लक्ष (अक्षरी रुपये एकशे तीस लक्ष फक्त) इतक्या रक्कमेची, उच्चस्तर धोरण समितीच्या दिनांक ०३.०२.२०२३ रोजीच्या बैठकीतील मान्यतेनुसार क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांना प्रतिपूर्ती करण्यासाठी रु.१३०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. वरीलप्रमाणे मंजूर निधी "मागणी क्र. ई-३ लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (३३) क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी (३३) (०१), क्रीडा विद्यापीठाची स्थापना (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) २२०४-२०६४ या लेखाशीर्षासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता वितरणाकरीता उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. वरीलप्रमाणे मंजूर निधी संदर्भ क्र.३ येथील शासन पत्र, दिनांक १३.०२.२०२३ मधील सूचनांनुसार तसेच, वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक १६.०३.२०२३ मधील निर्देश तसेच, वित्त विभागाने निधी वितरणाबाबत वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करण्याची कार्यवाही करण्यात यावी. तसेच, निधीच्या विनियोगाबाबत आवश्यक उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत सादर करावे.

४. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१७०/१४७१, दिनांक २५.०३.२०२३ व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.३९३/व्यय-५, दिनांक २९.०३.२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२९१९३२०४८४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.03.29 19:36:57 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राज्यपालांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६. सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
७. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक
८. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१०.आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे .
११.सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१२.लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे. (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१३.कोषागार अधिकारी, पुणे (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१४.सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१५.वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१६.नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१७.निवड नस्ती (क्रीयुसे-१).